20110114152347001

**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका**

महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील 'वरिष्ठ लिपिक' व 'नायब तहसिलदार' या पदाच्या पदनामात बदल करुन वेतनश्रेणी सुधारीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. पीसासी ३००६/८२१/प्र.क्र. १५५/०६/नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ३१ ऑगस्ट, २००९

वाचा :- (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३ अ/कावि/ २५/०६, दि. ३/३/२००६ आणि त्यासोबतचा वेतनत्रुटी समितीचा अहवाल व मनपा महासभा ठराव क्र. ५०६२, दि. ४/१२/२००३ व ठराव क्र. ५२३४ दि, १३/७/२००४

(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/ कावि/ ६०/ ०६, दि. १५/६/२००६

(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/ कावि/ १९२/ ०६, दि. २९/८/२००६

(४) या विभागाचा समक्रमांक दि. १४ डिसेंबर, २००७ रोजीचा शासन निर्णय.

(५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/ कावि/ ६३५ /०८, दि. २९/५/२००८ व त्यासोबतचा मनपा महासभा ठराव क्र. १४१, दि. १८/२/२००८

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील वेतनश्रेणीतील त्रुटी दूर करण्यासाठी या महापालिकेतील वरिष्ठ अधिकारी व कर्मचारी महासंघाचे प्रतिनिधी यांची वेतनत्रुटी समिती गठित केली होती. या समितीने मान्यता दिलेल्या आणि महापालिकेने महासभा ठरावाद्वारे मान्यता दिलेल्या काही पदांच्या वेतनश्रेण्या सुधारीत करणे आवश्यक असल्याचा निर्णय बैठकीत घेवून त्यानुसार प्रशासनास सादर केलेल्या वेतनत्रुटी समितीच्या अहवालानुसार काही पदांबाबत पुनर्सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याची शिफारस केली आहे. या अहवालास अनुसरुन महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील विविध पदांची वेतनश्रेणी सुधारित करण्यासाठी महापालिका ठराव क्र. ५०६१ दि. ४/१२/२००३ अन्वये महासभेने मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये महानगरपालिका आस्थापनेवरील काही संवर्गातील पदांच्या वेतनश्रेण्या पुनर्सुधारित करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यासोबतचा महानगरपालिकेचा आस्थापना खर्च, व वेतनत्रुटी समितीचा अहवाल देखील सादर केला आहे. त्या अनुषंगाने यापूर्वी संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये कॉम्प्युटर ऑपरेटर व कॉम्प्युटर प्रोग्रॅमर पदांची वेतनश्रेणी

सुधारीत करण्यास मान्यता दिलेली आहे. तथापी, महासभा ठराव क्र. १४१ दि. १८/०२/२००८ नुसार संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील उर्वरित **'नायब तहसिलदार'** या पदाचे पदनाम **'कार्यालय अधिक्षक'** आणि **'वरिष्ठ लिपिक (हेड क्लार्क)'** या पदाचे पदनाम **'मुख्य लिपिक'** असे सुधारीत करुन संबंधित पदांची वेतनश्रेणी देखील पुनर्सुधारित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी वेतनत्रुटी समिती अहवाल आणि महासभा ठराव क्र. ५०६१,दि. ४/१२/२००३ व ठराव क्र. १४१ दि. १८/२/२००८ च्या अनुषंगाने प्रस्तावित केल्यानुसार, पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील **"वरिष्ठ लिपिक"** आणि **"नायब तहसिलदार"** या संवर्गातील पदाचे पदनाम आणि वेतनश्रेणी खालील तक्त्यातील रकाना क्र. ४ व ५ येथे नमूद केल्याप्रमाणे सुधारित करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५१ अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सद्याचे पदनाम | सध्याची वेतनश्रेणी (रक्कम रुपयांत) | सुधारीत पदनाम | सुधारीत वेतनश्रेणी (रक्कम रुपयांत) |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १) | नायब तहसिलदार | ६५००-१०५०० | कार्यालयीन अधिक्षक | ७४५०-११५०० |
| २) | वरिष्ठ लिपिक (हेड क्लार्क) | ५०००-८००० | मुख्य लिपिक | ५५००-९००० |

०२. या आदेशातील पदनाम व वेतनश्रेणी सुधारणेबाबत सर्व सांविधानिक व विनियम विषयक बाबींची पूर्तता आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

( सुनील कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई - ३२
३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,२
४. निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२